**राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानातील परंपरागत कृषि विकास योजना ३२६ गटांकरिता सन २०२१-२२ मध्ये अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता राबविण्यास निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्सव्यवसाय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : योजना ३३२१/ प्र.क्र. १३२/१-अे**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, विस्तार, मुंबई- ४०००३२
दिनांक : २९ डिसेंबर २०२१

**संदर्भ:** १) केंद्र शासनाच्या पत्र क्र. ९-१५/२०१८-Org.Fmg, दि. ३० मे, २०१८ अन्वये प्राप्त परंपरागत कृषि विकास योजनेच्या सुधारित मार्गदर्शक सूचना.
२) कृषि आयुक्तालयाचे पत्र क्र.कृआ/पीकेव्हीवाय/पुर्न/१६५१६/२०२१, दिनांक २४.०५.२०२१
३) वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दिनांक ०६.०४.२०२१
४) केंद्र शासनाचे पत्र क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg(५९००६६/टीएफएस), दि. १०.०५.२०२१
५) केंद्र शासनाचे पत्र क्र. ९-३५/२०१५-Org.Fmg(५९००६६/टीटीएस), दि.१३.१०.२०२०
६) कृषिव पदुम विभाग शासन निर्णय क्र. योजना ३३२१/प्र.क्र.९०/१-अे, दि. ०६.०८.२०२१
७) आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी २०२१/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि. २०.१२.२०२१

**प्रस्तावना -:**

राज्य शासनाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०१५-१६ पासून केंद्र हिस्सा ६० टक्के व राज्य हिस्सा ४० टक्के या प्रमाणात राबविण्यात येत आहे. यामध्ये सन २०१७-१८ मध्ये ३२६ गटांची स्थापना करण्यात आलेली असून या गटांकरिता तीन वर्षांचा कार्यक्रम राबविण्यात येत आहे.

सन २०२०-२१ मध्ये ३२६ गटांच्या अखर्चित राहिलेल्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

**(रुपये लाखात)**

| गट (संख्या) | केंद्र हिस्सा (रु लाख) | राज्य हिस्सा (रु. लाख) | एकुण (रु लाख) |
|---|---|---|---|
| ३२६ | १८३.७९ | १२२.५३ | ३०६.३२ |

केंद्र शासनाने संदर्भ क्र. ०५ वरील पत्रानुसार सन २०१९-२० मधील सदर केंद्र हिश्श्याचा सर्व प्रवर्गाचा एकूण रू.१७२८.१९ लाख इतका निधी सन २०२०-२१ मध्ये पुर्नजिवित करून दिलेला असून त्यामध्ये अनुसुचित जमाती प्रवर्गाच्या रू. १०८.८७५९७ लाख इतक्या निधीचा समावेश होता. तसेच, सदर केंद्र हिश्श्याच्या रु.१७२८.१९ लाख एवढया निधीचा विनियोग ९३२ गट, नवीन ३५० गट व ३२६ गटांसाठी खर्च करण्यास केंद्र शासनाने संदर्भ क्र. ०५ वरील पत्रानुसार मान्यता दिलेली होती.

कृषि आयुक्तालयाने केंद्र शासनास केलेल्या विनंतीच्या अनुषंगाने संदर्भ क्र. ०४ वरील दिनांक १०.०५.२०२१ रोजीच्या पत्रानुसार वरील सदर योजना सन २०२१-२२ मध्ये ३२६ गटांकरिता सर्व प्रवर्गंकरिता राबविण्यासाठी रू.१८३.७९ लाख इतका निधी खर्च करण्यास व सदर निधी पुर्नजिवित करून देण्यास केंद्र शासनाने मान्यता दिलेली आहे. सदर योजना सन २०२१-२२ मध्ये राज्यात राबविण्याकरिता संदर्भ क्र. ०६ वरील शासन निर्यायान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे.

आदिवासी विकास विभागाच्या संदर्भ क्र.०७ वरील दि.२०.१२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये आदिवासी विकास विभागाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्याकरिता ३२६ गटांसाठी अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता केंद्र हिश्श्याचा रू. ११.५७८७७ लाख व राज्य हिश्श्याचा रू. ७.७१९३९ लाख, असा एकूण रू. १९.२९८१६ लाख निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता दिलेली आहे.

केद्र हिश्श्याच्या शिल्लक निधीच्या अनुषंगाने कृषि आयुक्तालयाने संदर्भ क्र. ०२ वरील पत्रान्वये निधी वितरणाबाबतचा प्रस्ताव शासनास सादर केलेला होता. सदर प्रस्तावाच्या अनुषंगाने राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०२१-२२ मध्ये ३२६ गटांकरिता अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता राबविण्यासाठी केंद्र हिश्श्याचा रू. ११.५७८७७ लाख व राज्य हिश्श्याचा रू. ७.७१९३९ लाख, असा एकूण रू. १९.२९८१६ लाख निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना सन २०२१-२२ मध्ये राबविण्यासाठी अनुसुचित जमाती प्रवर्गाकरिता, ३२६ गटांचा केंद्र हिश्श्याचा रू. ११.५७८७७ लाख व राज्य हिश्श्याचा रू. ७.७१९३९ लाख, असा एकूण रू. १९.२९८१६ लाख निधी कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च चालू सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाकरीता मंजुर केलेल्या अनुदानातून भागविण्यात येऊन पुढील लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

| केंद्र हिस्सा लेखाशिर्ष | राज्य हिस्सा लेखाशिर्ष |
|---|---|
| **मागणी क्रमांक -टी-५**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१ जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना<br>(०१)(३०)कृषि उन्नती योजना - परंपरागत कृषि विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना),<br>**केंद्र हिस्सा- ६०%,**<br>**२४०१ ए ७६२** कार्यक्रम, ३३ अर्थसहाय्य. | **मागणी क्रमांक -टी -५**<br>२४०१ पीक संवर्धन,<br>७९६ जनजाती क्षेत्र उपयोजना<br>०१ जनजाती क्षेत्र उपयोजनेंतर्गत योजना<br>(०१) (३१) कृषि उन्नती योजना - परंपरागत कृषि विकास योजना (केंद्र पुरस्कृत योजना),<br>**राज्य हिस्सा -४० %,**<br>**२४०१ ए ७७१** कार्यक्रम, ३३ अर्थसहाय्य. |

३. **राष्ट्रीय शाश्वत शेती अभियानांतर्गत परंपरागत कृषि विकास योजना राबविताना खालील अटी व शर्तींचे पालन करण्यात यावे.**

१. सदर योजना केंद्र शासनाच्या संदर्भाधिन मार्गदर्शक सुचनानुसार व केंद्र शासनाच्या निधी वितरीत करण्याच्या अटी व शर्ती नुसार आणि प्रशासकीय मान्यतेनुसार राबविण्यात यावी.

२. खर्चाचे लेखे सुव्यवस्थित ठेवून सदर खर्चाचे लेखा परिक्षण अहवाल व उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र व राज्य शासनाला लवकरात लवकर प्रगती अहवालासह सादर करण्यात यावेत. योजनेच्या वेगवेगळ्या बाबींवरील भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल केंद्र व राज्य शासनास प्रत्येक महिन्याच्या ५ तारखेपर्यंत सादर करण्यात यावा.

३. योजनेशी संबंधित ताळेबंद व लेखापरिक्षण जमा खर्चाच्या रकमा यांचा अहवाल अंमलबजावणी यंत्रणेने द्यावा. त्यामध्ये वर्षाच्या सुरूवातीला अखर्चीत रकमा व व्याजाद्वारे मिळालेले उत्पन्न स्पष्टपणे नमूद करण्यात यावे. जेणेकरून पारदर्शी स्वरूपात रकमा विचारात घेता येतील व संदिग्धता राहणार नाही.

४. कोणत्याही परिस्थितीत मंजूर कार्यक्रमापेक्षा जास्तीचा कार्यक्रम राबविला जाणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. ज्या संवर्गाकरिता निधी वितरीत करण्यात आलेला आहे त्याच संवर्गाकरिता निधी खर्च केला जाईल याची दक्षता घ्यावी.

४. सदर निधी खर्च करताना विहित कार्यपद्धती अनुसरून सर्व वित्तीय कायदे/टेंडर नियमावली व नियमांचे/प्रक्रियेचे/ वित्तीय अधिकारांच्या मर्यादेत / P.W.D मॅन्युअलचे अधिन राहून/C.V.C. तत्वानुसार / CAG च्या निर्देशानुसार/प्रचलित शासन निर्णय/ नियम/परिपत्रक / तरतुदीनुसार, बजेट व कोषागार नियमावलीनुसार खर्च करण्याची कार्यवाही अमंलबजावणी यंत्रणांनी करावी. कोणत्याही परिस्थितीत कुठलाही शासन नियम/ अधिकाराचा भंग होणार नाही, याबाबत दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय कार्यालयाची राहील. त्यांना या शासन निर्णयान्वये वितरीत केलेला सर्व निधी सर्व जिल्हयांना पीएफएमएस (PFMS) प्रणालीव्दारे वितरीत करण्याची कार्यपध्दती बंधनकारक राहील.

५. सदर योजनेकरिता आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना योजनेचे नियंत्रण अधिकारी म्हणून व त्यांच्या कार्यालयातील सहाय्यक संचालक, लेखा १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र. ०३ व ०४ मधील अटी व शर्ती आणि विहित कार्यपद्धतीचे पालन करण्याची दक्षता घ्यावी.

६. प्रस्तुतचे आदेश वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ मधील भाग- पहिला, उपविभाग तीन मधील अनु क्र. ४ येथील नियम २७ (२) (ब) अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांमध्ये काढण्यात येत आहेत. तसेच वित्त विभाग, शासन परिपत्रक क्रमांक अर्थसं -२०२१/ प्र.क्र.६४/अर्थ ३, दिनांक ०६.०४.२०२१ व शासन निर्णय क्र. अर्थसं -२०२१/ प्र.क्र.४८/अर्थ ३, दिनांक २४.०६.२०२१ व आदिवासी विकास विभाग शासन निर्णय क्र. बीयुडी २०२१/प्र.क्र.०७/कार्यासन-६, दि.२०.१२.२०२१ मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्यात यावी.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २०२११२२९१६००३४०८०१ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Umesh Narayan Chandiwade

Digitally signed by Umesh Narayan Chandiwade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Agriculture Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0a3a08c7339c487fe2836238383bf91bbd037b93b4bdf6c8e95d1969e585fffe, serialNumber=ccbe80fcc6b64503b4e8b1269bd88d631f3f3c2bef6e1ca70cc9a4e30954011f, cn=Umesh Narayan Chandiwade
Date: 2021.12.29 16:01:42 +05'30'

**( उमेश चांदिवडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/ विधानपरिषद यांचे खाजगी सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
४. सचिव (कृषि) यांचे स्वीय सहायक, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. संचालक (निविष्ठा व गुणनियंत्रण), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
७. महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर .
८. सर्व कृषि संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९. विभागीय कृषि सहसंचालक, नाशिक/लातूर/अमरावती/नागपूर
१०.सर्व प्रकल्प संचालक (आत्मा)
११.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१२. सहाय्यक संचालक, लेखा -१, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३. अवर सचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४. अवर सचिव, वित्त विभाग (व्यय-१), मंत्रालय, मुंबई.
१५. निवडनस्ती (कार्यासन १-अे), कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.